**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या नियंत्रणाखालील मान्यता व अनुदान प्राप्त आश्रमशाळा, विशेष शाळा, कर्मशाळा व समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्याची देयके समाजसेवार्थ प्रणालीद्वारे अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः सीओएम-२०१३/प्र.क्र.१०४/विघयो (संगणक)**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई- ४०००३२
तारीख: २६ सप्टेंबर, २०१४

<u>वाचा -</u>

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सकआ २०१२/प्र.क्र. ६०/आस्था-२, दि. १८ ऑक्टोबर, २०१२
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सकआ २०१२/प्र.क्र. ६०/आस्था-२, दि. २८ डिसेंबर, २०१२
३. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सकआ २०१२/प्र.क्र. ४७८/ आस्था-२, दि. ०९ नोव्हेंबर, २०१२
४. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सीओएम-२०१४/प्र.क्र.२२/१४/ विघयो(संगणक), दि. ०१ मार्च, २०१४

## परिपत्रक

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या नियंत्रणाखालील मान्यता प्राप्त व अनुदान प्राप्त विमुक्त जाती व भटक्या जमाती, अनुसूचित जाती व ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळा तसेच अपंगांच्या विशेष शाळा व कर्मशाळा आणि समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्याची देयके "समाजसेवार्थ" या संगणकीय प्रणालीद्वारे अदा करण्याचा शासनाने निर्णय घेतला असून प्रथम टप्प्यात प्रायोगिक तत्त्वावर (Pilot Basis) मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पुणे व लातुर या पाच जिल्हयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची वेतन देयके समाजसेवार्थ प्रणालीद्वारे अदा करण्याचे आदेश शासन निर्णय दि. १८.१०.२०१२ अन्वये निर्गमित केले आहे. या अनुषंगाने सदर पाच जिल्हयातील मान्यता प्राप्त व अनुदान प्राप्त संस्थांचे समाजसेवार्थ प्रणालीवर कॉन्फ्रीग्रेशन (Configuration) करणे व ते प्रमाणित करुन कर्मचाऱ्यांची माहिती भरणे आणि भरलेली माहिती प्रमाणित करणे या सर्व बाबी पुर्ण झाल्यानंतर दि. २८.१२.२०१२ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील उर्वरीत जिल्हयातील मान्यता प्राप्त व अनुदान प्राप्त विमुक्त जाती व भटक्या जमाती, अनुसूचित जाती व ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळा तसेच अपंगांच्या विशेष शाळा व कर्मशाळा आणि

समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्याची देयके "समाजसेवार्थ" या संगणकीय प्रणालीद्वारे अदा करण्याचे आदेश निर्गमित केले आहेत.

तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या नियंत्रणाखालील मान्यता प्राप्त व अनुदान प्राप्त विमुक्त जाती व भटक्या जमाती, अनुसूचित जाती व ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळा तसेच अपंगांच्या विशेष शाळा व कर्मशाळा आणि समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती शासन निर्णय दि. ९ नोव्हेंबर, २०१२ अन्वये विहित केली असून अंशदानाची रक्कम जमा करण्यासाठी निर्माण केलेल्या लेखाशिर्षांबाबत शासन निर्णय दि. १.०३.२०१४ अन्वये सर्व संबंधितांना अवगत केले आहे.

तथापि, समाजसेवार्थ प्रणालीद्वारे वेतन देयके सादर करताना संबंधित परिभाषित अंशदानाच्या रकमा वसुलीची कार्यवाही करण्यास काही तांत्रिक अडचणी (एम.टी.आर. - ४४ मध्ये वेतन देयकातील नवीन परिभाषित अंशदानाची वसुलीची रक्कम दिसून न येणे) उद्भवल्याचे व त्यामुळे विभागाच्या अधिपत्याखालील अनुदानीत संस्थांमधील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची डीसीपीएस ची अंशदानाची वसुली करता आलेली नाही. परिणामी वेतन अदा करता आलेले नाही, असे निदर्शनास आले आहे.

याकरीता समाजसेवार्थ प्रणालीद्वारे वेतन देयके सादर करताना परिभाषित अंशदानाच्या वसुलीची रक्कम प्रचलित पध्दतीने (Manually-चलनाद्वारे) संबंधित मुख्याध्यापक / प्राचार्य यांनी कोषागारात चलनाद्वारे भरणा करावी व त्या चलनाची प्रत पुढील महिन्याच्या देयका सोबत सादर करावी व अशा वसुलीचा हिशेब संस्था स्तरावर ठेवावा व तो दरवर्षी सहायक आयुक्त, समाजकल्याण / जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांचेकडून प्रमाणित करुन घ्यावा. तसेच कोणत्याही परिस्थितीत वेतन देयके समाजसेवार्थ प्रणालीद्वारेच सादर करण्याची दक्षता घ्यावी, असे या परिपत्रकान्वये कळविण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४०९२६१७२६०३४८२२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Pandurang Wadte

Digitally signed by Kiran Pandurang Wadte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kiran Pandurang Wadte
Date: 2014.09.26 17:37:31 +05'30'

**(कि. पां. वडते)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान (सामान्य प्रशासन विभाग), विभाग, मंत्रालय, मुंबई

२. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, लेखा व कोषागारे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, समाजकल्याण, पुणे
५. आयुक्त, अपंगकल्याण, पुणे
६. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, पुणे
७. महालेखापाल (लेखापरिक्षा / लेखा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१०.सहसंचालक (वित्तीय सुधारणा), लेखा व कोषागारे, मुंबई
११.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण
१२.सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
१३.सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१४.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६.निवडनस्ती (विघयो - संगणक)